**इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत अनुदानित तत्त्वावर चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळांतील अर्धवेळ ग्रथपालांचे पुर्णवेळ ग्रंथपाल पदी उन्नयन (रुपांतरण) करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक विभशा-२०२१/प्र.क्र.५२/विजाभज-१**
मंत्रालय विस्तार इमारत, पहिला मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- ०१ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ:-**
१. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक एसएसएन- २६०३/(४१/०३)/माशि-२, दिनांक २५ नोव्हेंबर, २००५.
२. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक एसएसएन- १७०२/ (९/२००२)/माशि-२, दिनांक ३ ऑगस्ट, २००६.
३. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक एसएसएन-२०१८/(२४३/१८)/टीएनटी-२, दिनांक १ सप्टेंबर, २०१८.
४. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र. इमावबकसं/अर्धवेळ/ग्रंथपाल/पुर्णवेळ/२०२१-२२/१६५८, दि.०१ नोव्हेंबर, २०२१
५. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक एसएसएन-२०१८/(२४३/१८)/टीएनटी-२, दिनांक १ सप्टेंबर, २०१८.
६. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक एसएसएन-२०१८/(२४३/१८)/टीएनटी-२, दिनांक १३ एप्रिल, २०२३ व दि.७ नोव्हेंबर, २०२३

**प्रस्तावना:-**

शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, संदर्भ क्र.१ अन्वये राज्यातील खाजगी अनुदानित शाळांमधील शिक्षकेत्तर पदांचा (चतुर्थश्रेणी वगळून) आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे. सदरहू आकृतीबंधान्वये इ. ६ वी ते १२ वी मधील पटसंख्या १००१ पेक्षा अधिक असलेल्या शाळांमध्ये १ पूर्णवेळ ग्रंथपाल पद व १०१ ते १००० पर्यंत पटसंख्या असल्यास १ अर्धवेळ ग्रंथपाल पद अनुज्ञेय करण्यात आले आहे.

२. राज्यातील इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या अधिनस्त असलेल्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित निवासी माध्यमिक आश्रमशाळांमध्ये २७ ग्रंथपालांना अर्धवेळ म्हणून नेमणूक दिलेल्या आहेत. प्रत्यक्षात त्यांचे काम पूर्णवेळ स्वरुपाचे आहे. तांत्रिकदृष्ट्या केवळ अर्धवेळ नेमणूक असल्याने त्यांना सेवेत कोणत्याही प्रकारचा लाभ अनुज्ञेय नाही. "समान काम समान वेतन" या नैसर्गिक न्याय तत्वानुसार आश्रमशाळांतील सदरच्या अर्धवेळ ग्रंथपालांना पूर्णवेळ ग्रंथपालांचा दर्जा देणेबाबत दि.०१/०९/२०२१ रोजी तत्कालीन मा.मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) महोदयांच्या अध्यक्षतेखाली आयोजित बैठकीत निर्देशानुसार संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी संदर्भ क्र.४ येथे नमूद पत्रान्वये, राज्यातील इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत चालविण्यात येणाऱ्या खाजगी अनुदानित निवासी माध्यमिक आश्रमशाळांतील २७ अर्धवेळ ग्रंथपालांना पुर्णवेळ ग्रंथपाल म्हणून मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे.

३. इतर मागास बहुजन कल्याण विभागामार्फत सद्यस्थितीत विजाभज प्रवर्गाच्या २९८ अनुदानित निवासी माध्यमिक आश्रमशाळा चालविल्या जातात. त्यापैकी केवळ २७ माध्यमिक आश्रमशाळांमध्येच अर्धवेळ ग्रंथपाल कार्यरत असून उर्वरित माध्यमिक आश्रमशाळांसाठी ग्रंथपाल पद मंजूर करण्यात आलेले

नाही. विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळेमधील प्रवेशित विद्यार्थी संख्या मर्यादित स्वरुपात असल्याने ग्रंथपाल पदासाठी आवश्यक असलेल्या निकषाची पुर्तता होत नाही. यास्तव, ज्या विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळांतील विद्यार्थी संख्या शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, दि.२५/११/२००५ नुसार १००० पेक्षा कमी आहे अशा आश्रमशाळेवर कार्यरत अर्धवेळ ग्रंथपालांना १०-२० किमी परिघातील विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित दोन-तीन निवासी आश्रमशाळांतील विद्यार्थी मिळून पूर्णवेळ ग्रंथपाल म्हणून मान्यता द्यावी. अशाप्रकारे विद्यार्थी संख्या १००० पेक्षा जास्त झाल्यास त्यांना ग्रंथपालाचे काम द्यावे तसेच या २७ अर्धवेळ ग्रंथपालांचा संवर्ग कायमचा **'मृत संवर्ग'** (Dead Cadre) म्हणून घोषित करून "विशेष बाब" म्हणून अर्धवेळ ग्रंथपालांना पुर्णवेळ ग्रंथपाल म्हणून मान्यता द्यावी. अशाप्रकारे पूर्णवेळ ग्रंथपाल म्हणून मान्यता दिल्यास संबंधितांच्या वेतनापोटी देय होणारा खर्च हा काही कालावधीपुरताच म्हणजेच संबंधित कर्मचारी सेवेत असेपर्यंतच त्यांच्या वेतनाचा खर्च शासनाच्या तिजोरीवर पडणार आहे. कारण सदर संवर्ग मृत संवर्ग घोषित केल्याने उपरोक्त आश्रमशाळांमधील ग्रंथपालाचे पद कोणत्याही कारणास्तव (सेवानिवृत्ती/स्वेच्छानिवृत्ती/राजीनामा/मृत्यु इ.) रिक्त झाल्यास आपोआप व्यपगत होईल. या २७ ग्रंथपालातील शेवटचा कर्मचारी सेवानिवृत्त झाल्यानंतर सदर संवर्ग कायमचा संपुष्टात येऊन ग्रंथपालांच्या वेतनापोटीचा खर्च संपुष्टात येणार असल्याने उक्त अर्धवेळ ग्रंथपालांचे पद पूर्णवेळ म्हणून उन्नयन (रुपांतरण) करण्याचा प्रस्ताव शासन स्तरावर तपासण्यात येत होता.

४. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या आस्थापनेवरील अर्धवेळ ग्रंथपालांचे उपलब्ध असलेल्या २११८ पूर्णवेळ ग्रंथपालांच्या पदांच्या मर्यादेत उन्नयन (रुपांतरण) करण्याबाबत प्राप्त झालेल्या अहवालाच्या आधारे दोन व तीन शाळा एकत्रित करुन शाळा मॅपिंग अहवालानुसार १००१ विद्यार्थी संख्येचा निकष पूर्ण झाल्यानंतर उपलब्ध होणाऱ्या पदांवर सर्वप्रथम उर्वरित अर्धवेळ ग्रंथपालांचे पूर्णवेळ ग्रंथपाल म्हणून उन्नयन (रुपांतरण) करण्यास तसेच या कार्यवाहीनंतर शिल्लक राहिलेल्या अर्धवेळ ग्रंथपालांचे टप्याटप्याने पूर्णवेळ ग्रंथपालपदी उन्नयन (रुपांतरण) करण्यास शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, संदर्भ क्र.५ अन्वये शासन मान्यता देण्यात आली आहे. तद्नंतर शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, संदर्भ क्र.६, दि.१३.०४.२०२३ अन्वये त्या विभागाच्या आस्थापनेवरील उर्वरित ११९२ अर्धवेळ ग्रंथपालांच्या नियुक्तीस मंजुर पदांच्या संख्येत अटी व शर्तीनुसार पूर्णवेळ ग्रंथपाल म्हणून मान्यता देण्यात आली आहे.

५. उपरोक्त पार्श्वभूमीवर, शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या उक्त निर्णयाच्या धर्तीवर तसेच त्या विभागाच्या शासन निर्णय, संदर्भ क्र.६ मधील तरतूद व अटी व शर्ती अधिन या विभागाच्या अधिनस्त असलेल्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित माध्यमिक निवासी आश्रमशाळेमध्ये सद्यस्थितीत कार्यरत असलेल्या २५ अर्धवेळ ग्रंथपालांच्या संवर्गास **'मृत संवर्ग'** (Dead Cadre) घोषित करून ते सेवेत आहेत तो पर्यंतच्या कालावधीसाठी त्यांचे पद पुर्णवेळ ग्रंथपाल म्हणून उन्नयन (रुपांतरण) करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

इतर मागास बहुजन कल्याण विभागामार्फत चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित निवासी माध्यमिक आश्रमशाळेत परिशिष्ट - अ मध्ये नमूद सद्यस्थितीत सेवेत कार्यरत एकूण २५ अर्थवेळ ग्रंथपालांच्या संवर्गास **'मृत संवर्ग'** (Dead Cadre) घोषित करून ग्रंथपालांचे पद त्यांच्या सेवानिवृत्तीपर्यंत पुर्णवेळ ग्रंथपाल म्हणून उन्नयन (रुपांतरण) करण्यास खालील अटींच्या अधीन राहुन मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर अर्धवेळ ग्रंथपालाचे पद पूर्णवेळ ग्रंथपाल उन्नयन (रुपांतरण) केल्यानंतर या शासन निर्णयाच्या दिनांकापासून शालेय शिक्षण व क्रीडा विभागाकडील पूर्णवेळ ग्रंथपाल पदासाठी अनुज्ञेय वेतनश्रेणी संबंधितांना लागू राहील. व त्या वेतनश्रेणीतील किमान टप्प्यावर त्यांचे

वेतन निश्चित होईल. तथापी, सदर वेतनश्रेणीच्या अनुषंगाने कोणतेही लाभ पूर्वलक्षी प्रभावाने लागू होणार नाहीत.

२. उक्त प्रमाणे पूर्णवेळ ग्रंथपाल पदात रुपांतरीत सोबत जोडलेल्या परिशिष्ट - अ मधील आश्रमशाळांतील कर्मचारी यांची आदेशाच्या दिनांकापूर्वी सेवानिवृत्ती / स्वेच्छासेवानिवृत्ती / राजीनामा / मृत्यु / अथवा अन्य अस्थापनेवरील इतर पदी नियुक्ती झाली असल्यास किंवा सेवा सोडून गेले असल्यास त्यांना उक्तप्रमाणे त्यांना कोणतेही लाभ अनुज्ञेय असणार नाहीत.

३. सदर आदेशाद्वारे मान्यता देण्यात येत असलेल्या अर्हताप्राप्त व्यक्तीची अर्धवेळ ग्रंथपाल म्हणून शासनाच्या विहित नियमानुसार नियुक्ती झालेली असेल व अशा नियुक्तीस सक्षम प्राधिकाऱ्याने मान्यता दिलेली असेल अशाच अर्धवेळ ग्रंथपालांना पुर्णवेळ ग्रंथपाल पदाचे लाभ अनुज्ञेय राहतील. त्यानुसार सोबतच्या परिशिष्ट- अ मध्ये नमूद २५ कर्मचाऱ्यांपैकी सर्व कर्मचारी सेवेत असल्याबाबत तसेच नियुक्तीबाबतची खात्री करण्याची जबाबदारी संबंधित प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग यांची राहील. यातील ज्या कर्मचाऱ्यांच्या सेवेबाबत खात्री होत नसल्यास अथवा काही शंका असल्यास तसे लेखी शासनास कळवावे.

४. ग्रंथपाल हा संवर्ग मृत संवर्ग घोषित करण्यात आल्याने सोबत जोडलेल्या परिशिष्ट - अ येथे नमूद कर्मचाऱ्यांची सेवानिवृत्ती / स्वेच्छासेवानिवृत्ती / राजीनामा / मृत्यु / इतर पदी नियुक्ती झाली किंवा अन्य कोणत्याही कारणास्तव पद रिक्त झाल्यास संबंधित माध्यमिक आश्रमशाळेतील सदरचे पद कायमचे व्यपगत होईल. सदर संवर्गात नवीन कोणतीही पदनिर्मिती / पदभरती करण्यात येणार नाही.अथवा त्यास मान्यता देण्यात येणार नाही.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व शासन मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२४०८०२१७५८४८२६३४ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2024.08.02 18:16:48 +05'30'

**( कैलास साळुंके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
२. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
३. मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव.
४. मा विरोधी पक्षनेता (विधानपरिषद/विधानसभा), यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
७. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
८. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग (सर्व)
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
१२. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण (सर्व).
१३. प्रधान सचिव (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती (विजाभज-१).

**शासन परिपत्रक, क्रमांक विभशा-२०२१/प्र.क्र.५२/विजाभज-१,दि.०१/०८/२०२४ सोबतचे**

**परिशिष्ट - अ**

| अ.क्र. | जिल्हा | आश्रमशाळेचे नांव | कार्यरत अर्धवेळ ग्रंथपालाचे नाव |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | जळगांव | माध्यमिक आश्रमशाळा, करगांव, ता. चाळीसगांव, जि.जळगांव | श्री. श्रीकांत गुलाब पवार |
| २ | जळगांव | माध्यमिक आश्रमशाळा, पिंपरखेड तांडा, ता.चाळीसगांव, जि. जळगांव | श्री. गणेश उखा जाधव |
| ३ | जळगांव | माध्यमिक आश्रमशाळा, गाळण बु. ता.पाचोरा, जि. जळगांव | श्री. संजय एकनाथ गंभीर |
| ४ | जळगांव | कळसाबाई शंकर पवार माध्यमिक आश्रमशाळा, वरसाडे तांडा, ता.पाचोरा, जि. जळगांव | श्री. छगन रतन राठोड |
| ५ | जळगांव | माध्यमिक आश्रमशाळा, वसंतनगर, ता.पारोळा, जि.जळगांव | श्री. कैलास राजधर चौधरी |
| ६ | अहमदनगर | माध्यमिक आश्रमशाळा, वसंतनगर, ता. पारोळा, जि. अहमदनगर | श्री. योगेश पांडुरंग नऱ्हे |
| ७ | बीड | माध्यमिक आश्रमशाळा, मराठवाडी तांडा, ता.आष्टी, जि.बीड | श्री. चंद्रकांत मोहन वाणी |
| ८ | परभणी | माध्यमिक आश्रमशाळा, दर्गा पारवा रोड, ता.जि.परभणी. | श्रीमती वर्षा ग्यानुजी मस्के |
| ९ | सातारा | समता माध्यमिक आश्रमशाळा, पाडेगांव, ता. खंडाळा, जि. सातारा. | श्री. माने दिपक विठ्ठल |
| १० | सोलापूर | माध्यमिक आश्रमशाळा, वाखरी, ता.पंढरपूर, जि.सोलापूर. | श्री. दत्तात्रय विश्वनाथ सुरवसे |
| ११ | सोलापूर | माध्यमिक आश्रमशाळा, येड्राव-खवे, ता.मंगळवेढा, जि.सोलापूर | श्री.संजय जगन्नाथ हजारे |
| १२ | सोलापूर | माध्यमिक आश्रमशाळा, तांबेवाडी, ता.बार्शी, जि.सोलापूर. | श्री.गणेश फुलचंद राठोड |
| १३ | सोलापूर | माध्यमिक आश्रमशाळा, लांबोटी, ता.मोहोळ, जि.सोलापूर | श्री.संतोष माणिक पोटे |
| १४ | सोलापूर | माध्यमिक आश्रमशाळा, बालाजीनगर, ता.मंगळवेढा, जि.सोलापूर | श्री.लक्ष्मण भगवान राठोड |
| १५ | सोलापूर | माध्यमिक आश्रमशाळा, कडबगाव, ता.अक्कलकोट, जि.सोलापूर | श्री.शहाजी संभाजी शेळके |
| १६ | सोलापूर | माध्यमिक आश्रमशाळा, कामती, ता.मोहोळ, जि.सोलापूर | श्री.सुरेश पांडुरंग राठोड |
| १७ | लातूर | माध्यमिक आश्रमशाळा, मनोहरतांडा, ता.औसा, जि.लातूर | श्री.मिटकरी अभयकुमार बरवराजअप्पा |
| १८ | लातूर | माध्यमिक आश्रमशाळा, बोरताळापाटी, ता.उदगीर, जि.लातूर | श्री.पाटील स्वप्नील विजयकुमार |

| अ.क्र. | जिल्हा | आश्रमशाळेचे नांव | कार्यरत अर्धवेळ ग्रंथपालाचे नाव |
|---|---|---|---|
| १९ | नांदेड | माध्यमिक आश्रमशाळा, हस्सापूर, जि.नांदेड | श्री.काटकळंबेकर नरेशकुमार व्यंकटराव |
| २० | नांदेड | माध्यमिक आश्रमशाळा, वाघाळा, नविन नांदेड | श्री.नल्लेवाड दिलीप दिगांबर |
| २१ | हिंगोली | माध्यमिक आश्रमशाळा, रामेश्वरतांडा, ता.कळमनुरी, जि.हिंगोली | श्री.बाळू रुपसिंग पवार |
| २२ | हिंगोली | माध्यमिक आश्रमशाळा, औंढा, ता.औंढा, जि.हिंगोली | श्री.संजय मुंजाजी अटकोरे |
| २३ | यवतमाळ | विजाभज कनिष्ठ महाविद्यालय म्हाळुंगी, ता. आर्णी, जि. यवतमाळ. | श्री. प्रविण वसराम राठोड |
| २४ | यवतमाळ | विजाभज कनिष्ठ महाविद्यालय ढाकणी, ता. उमरखेड, जि. यवतमाळ. | श्री. दिलीप काशिनाथ गंगळपाड |
| २५ | यवतमाळ | विजाभज माध्यमिक आश्रमशाळा, तिवरी ता. दिग्रस, जि. यवतमाळ. | श्री. दिनेश पांडुरंग वैद्य |

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93ce e29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD73 39A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2024.08.02 18:17:10 +05'30'

**( कैलास साळुंके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**